नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका
आस्थापनेवर वर्ग-३ व वर्ग-४ ची नवीन पदे निर्माण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : नांवाशमनपा-२०१०/५१४/प्र.क्र.८६/०७/नवि-२४,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३ जुलै,२०१०

**वाचा :** १) शासन अधिसूचना नगर विकास विभाग क्र.नांवाशमनपा १३०७/१०५२/प्र.क्र.३९५/०७/नवि-२४ दिनांक १.७.२००९
२) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका,नांदेड यांचे क्र.नांवाशमनपा/साप्रवि/आस्था-५/९६७/१०१०, दिनांक ३.५.२०१० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

मौजे तरोडा(बुद्रक) व मौजे तरोडा (खुर्द) ही दोन्ही महसूली गावे जिल्हा परिषद क्षेत्रातून वगळून नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीत, शासन अधिसूचना दि.१.७.२००९ अन्वये समाविष्ट करण्यात आलेली आहेत. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ४९३ संक्रमणकालीन तरतूदीनुसार परिशिष्ट ४ मधील भाग १ चे नियम ५(क) नुसार स्थानिक प्राधिकरणाचा समावेश झालेल्या भागातील त्या तारखेपूर्वीच्या सर्व नेमणूका महानगरपालिकेच्या नेमणूका होत्या, असे गृहीत धरण्याची तरतूद आहे. त्यानुसार मौजे तरोडा (बुद्रक) व तरोडा (खुर्द) या ग्रामपंचायत कडील वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावरील एकूण २४ कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या आस्थापनेवर सामावून घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावास नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने दि.१८.८.२००९ रोजी ठराव क्र.८३ अन्वये मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णयः-**

नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर खालील परिशिष्टात नमूद केलेली एकूण २४ पदे मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ५१ च्या पोटकलम (४) अन्वये नव्याने निर्माण करण्यास व या २४ पदावर मौजे तरोडा (बु.) व तरोडा (खु.) या दोन्ही महसूली गावातील महानगरपालिकेत समाविष्ट झालेल्या कर्मचाऱ्यांना सामावून घेण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देत आहे.

१) नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका आस्थापनेवर समाविष्ठ होणा-या २४(चोवीस) कर्मचाऱ्यांना शासन आदेशाचा दिनांक सेवाजेष्ठतेसाठी धरण्यात यावा.
२) संबंधितांच्या पूर्वीच्या सेवेचा कालावधी हा नवीन परिभाषित उपदानासाठीच ग्राहय धरण्यात यावा.

| अ.क्र. | पदांचे नांव | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | वरिष्ठ लिपिक | ४ | ४०००-६००० |
| २ | कनिष्ठ लिपिक | ११ | ३०५०-४५९० |
| ३ | शिपाई | ९ | २५५०-३२०० |
| | एकूण | २४ | |

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( स्मिता द. मंत्री )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे विशेष कार्य अधिकारी
सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड (५ प्रती)
कक्ष अधिकारी, नवि-२९ (आदेश वेबसाईटवर टाकण्यासाठी)
निवडनस्ती (नवि-२४)